राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियांनातर्गत यशवंत मल्टीस्टेट को.ऑपरेटिव्ह मिल्क सोसायटी लि.,ता.शिराळा, जि.सांगली यांना दुग्धपदार्थ निर्मिती प्रकल्प उभारणीसाठी सुधारीत प्रशासकीय मंजूरीबाबत...

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एमएलके २०१२/प्र.क्र.७४ /पदुम-८**

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२

तारीख: २३ फेब्रुवारी, २०१७

वाचा : . १) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३०.७.२०१४

२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २१.११.२०१५,दिनांक २१.९.२०१६

३) आयुक्त दुग्धव्यवसाय यांचे पत्र क्र. आदुवि ६/RKVY-NMPS/यशवंत संघ/ शिराळा/ २०१४-१५/ ३२०/ १९३०, दि.१३.१०.२०१६

४)कृषि व पदुम विभागाचे क्र. आरकेव्ही- ०९१६/सी.आर.१३६/आरकेव्हीवाय सेल, दि.७.२.२०१७ अन्वये निर्गमित केलेले राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या दि.२३.१.२०१७ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेअंतर्गत विशेष योजनेखाली राबविण्यात येत असलेल्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान या कार्यक्रमाखाली यशवंत मल्टीस्टेट को.ऑपरेटिव्ह मिल्क सोसायटी लि.,शिराळा, जि.सांगली यांना दुग्धपदार्थ निर्मिती प्रकल्पाच्या उभारणीसाठी रु.९.९८ कोटी रक्कमेचा प्रकल्प संदर्भ क्र.१ अन्वये मंजूर करण्यात आला आहे. सदर राकृवियो हिस्सा ५० टक्के व लाभार्थी हिस्सा ५० टक्के या तत्वावर प्रकल्प राबविण्यास मान्यता दिली आहे. तसेच संदर्भ क्र.२ अन्वये सदर प्रकल्पासाठी राकृवियो हिस्स्यापोटीचा संपूर्ण हिस्सा वितरीत करण्यात आला आहे. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास यांनी संदर्भ क्र.३ अन्वये, यशवंत मल्टीस्टेट को.ऑपरेटिव्ह मिल्क सोसायटी लि.,शिराळा, जि.सांगली यांच्या मंजूर प्रकल्पातील दूध भुकटी प्रकल्प उभारणी संघास आर्थिकदृष्टया सोयीची होत नसल्याने सदर घटकात बदल करुन त्याऐवजी अन्य घटकांचा समावेश करण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर केला. सदर प्रस्ताव दि.२३.१.२०१७ रोजीच्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकीत ठेवण्यात आला होता. राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीने सदर बैठकीत उपरोक्त प्रस्तावास मान्यता दिली व त्यानुसार संदर्भ क्र.४ अन्वये सदर बैठकीचे इतिवृत्त निर्गमित करण्यात आले आहे. आयुक्त दुग्धव्यवसाय यांनी सादर केलेला प्रस्ताव व संदर्भ क्र.४ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या इतिवृत्तानुसार, यशवंत मल्टीस्टेट सहकारी दूध संघ, शिराळा या संघाच्या घटक बदली प्रस्तावास सुधारीत प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासन या निर्णयान्वये राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या विशेष कार्यक्रमातर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण कार्यक्रमाखाली यशवंत मल्टीस्टेट को.ऑपरेटिव्ह मिल्क सोसायटी लि..,शिराळा, जि.सांगली यांना दुग्धपदार्थ निर्मिती प्रकल्प उभारणीसाठी मंजूर असलेल्या प्रकल्पातील रु.१,९५,००,०००/- इतक्या रक्कमेचा ५ मे.टन दूध भुकटी प्रकल्प हा घटक वगळून, सदर घटकासाठी मंजूर निधीतून संघास स्वच्छ व चांगल्या गुणप्रतीचे दूध उपलब्ध होण्याच्या दृष्टीने संघास आवश्यक असलेले खालील नवीन घटकांवर खर्च करण्यास मान्यता देत आहे .

(रुपयात)

| अ.क्र. | प्रस्तावित बदली घटक तपशील | नग | रक्कम |
|---|---|---|---|
| १ | ॲल्युमिनिअम कॅन्स | २४४४ | ७२,५८,६००/- |
| २ | इको मिल्क अल्ट्रा | ४० | २२,०५,०००/- |
| ३ | मिल्को स्क्रीन | २ | ७,५०,०००/- |
| ४ | बल्क मिल्क कुलर ३०००लि. | २ | २२,१७,९४५/- |
| ५ | रॉ मिल्क रिसिव्हिंग डॉक ॲटोमेशन सिस्टिम | १ | १७,१०,२२३/- |
| ६ | कॅन कन्व्हेअींग सिस्टिम विथ वेअींग बाऊल ॲन्ड डंपटॅंक | १ | २२,४२,८६०/- |
| ७ | स्टीम बायलर १मे.टन | १ | १८,०८,०००/- |
| ८ | रेफ्रिजरेटर व्हॅन | १ | १९,८७,४८३/- |
| ९ | पेढा मेकिंग मशीन | १ | २,३४,६२५/- |
| | **एकूण** | | २,०४,१४,७३६/- |

राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या विशेष कार्यक्रमातर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण कार्यक्रमाखाली खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

अटी व शर्ती :-

१. मंजूर करण्यात आलेला निधी खर्च करण्याकरीता अटी व शर्ती हया दिनांक ३०.७.२०१४ मध्ये नमूद केल्याप्रमाणे कायम राहतील.

२. प्रकल्पात मंजूरी प्रदान केलेल्या मर्यादेपेक्षा अधिकचा निधी शासनामार्फत अनुदान म्हणून मंजूर करण्यात येणार नाही. तसेच उपरोक्त मंजूर घटकांसाठी होणारा जास्तीचा खर्च हा संघाने स्वनिधीतून स्वत: करणे आवश्यक राहील.

३. संघाने सदर प्रकल्प विहित कालावधीत कार्यान्वित करुन वितरीत करण्यात आलेला निधी विनियोग केला असल्याबाबतचे विहित नमुन्यातील अंतिम लेखापरीक्षित उपयोगिता प्रमाणपत्र व प्रकल्पाचे अंतिम पूर्णत्व प्रमाणपत्र संबंधित जिल्हयाच्या दुग्धव्यवसाय विकास अधिकारी / प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास यांनी संघाकडून प्राप्त करुन घ्यावे व ते शासनास सादर करावे. तसेच प्रकल्पाच्या प्रगतीबाबत आढावा घेण्यासाठी त्रैमासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल छायांकितप्रतीसह आयुक्त दुग्धव्यवसाय विकास व शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०२२३१२३८५१६१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Shaligram Govil

Digitally signed by Rajesh Shaligram Govil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c549410b2251df8c92783a2da17afcacbe7f8fe3a4fd88f156fea84433871f11, cn=Rajesh Shaligram Govil
Date: 2017.02.23 12:43:03 +05'30'

**(राजेश गोविल)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (कृषि ), मा.मंत्री (पदुम), मा.राज्यमंत्री (पदुम)यांचे खाजगी सचिव
४. मा.विरोधी पक्ष नेता) विधानसभा / विधानपरिषद (यांचे खाजगी सचिव
५. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मा.सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
८. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
९. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-४०० ०१८
१०.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ म., पश्चिम द्रुतगती मार्ग, गोरेगाव, मुंबई
११.प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,पुणे विभाग,पुणे
१२.विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) पुणे विभाग, पुणे
१३.जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, पुणे
१४.जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, पुणे
१५.जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, पुणे
१६.महालेखापाल १/२, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), मुंबई/ नागपूर
१७.कक्ष अधिकारी, राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मुंबई
१८. व्यवस्थापकीय संचालक, यशवंत मल्टीस्टेट को.ऑपरेटिव्ह मिल्क सोसायटी लि..,शिराळा, जि.सांगली
१९.निवड नस्ती